**श्री.श्रीकांत श्रीधर देशपांडे, सेवानिवृत्त वित्त व लेखा अधिकारी, कवि कुलगुरु कालीदास संस्कृत विद्यापीठ, रामटेक, जि.नागपूर यांना वेतनश्रेणी अनुज्ञेय करुन सेवानिवृत्ती वेतन अनुज्ञेय करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः न्यायाप्र २०१४/(१६७/१४) /विशि-१**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०००३२,
तारीख: २३ जुलै, २०१५

संदर्भ -

१) **संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे क्र. ककासंवि/न्या.प्र./(४१/१४-)/२०१४-१५/विशि-१/९१६७, दि.०३ नोव्हेंबर, २०१४ चे पत्र**

प्रस्तावना -

श्री.श्रीकांत श्रीधर देशपांडे, सेवानिवृत्त वित्त व लेखा अधिकारी, कवि कुलगुरु कालीदास संस्कृत विद्यापीठ, रामटेक, जि.नागपूर यांनी त्यांना रु.१०६५०-१५८५० ही वेतनश्रेणी लागू करुन त्यानुसार सेवानिवृत्ती वेतनाचे लाभ मिळण्याबाबत मा.उच्च न्यायालय, नागपूर खंडपीठ, नागपूर येथे याचिका क्र.४५४५/२०१३ दाखल केली आहे. सदर याचिकेवर मा.उच्च न्यायालयाने दि.२६ ऑगस्ट, २०१४ रोजीच्या आदेशानुसार त्यांना रु.८०००-१३५०० ही वेतनश्रेणी लागू करुन त्यानुसार सेवानिवृत्तीचे लाभ देण्याचे आदेश दिले आहेत. याप्रकरणी मा.उच्च न्यायालयाच्या दि.२६ ऑगस्ट, २०१४ च्या आदेशाविरुध्द मा.सर्वोच्च न्यायालयात विशेष अनुमती याचिका दाखल करण्याची कार्यवाही सुरु आहे. विधी व न्याय विभागाच्या दि.०२ एप्रिल, २०१४ च्या परिपत्रकातील सूचना विचारात घेता याप्रकरणी मा.उच्च न्यायालयाच्या आदेशास मा.सर्वोच्च न्यायालयाची स्थगिती मिळालेली नसल्याने मा.उच्च न्यायालयाच्या दि.२६ ऑगस्ट, २०१४ च्या आदेशाची अंमलबजावणी करणे आवश्यक आहे.

२. वर नमूद केलेल्या मा.उच्च न्यायालयाच्या आदेशाची अंमलबजावणी करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

प्रस्तावनेत नमूद केलेल्या सर्व बाबी विचारात घेऊन शासन पुढीलप्रमाणे मान्यता देत आहे :-

डॉ.श्रीकांत श्रीधर देशपांडे, सेवानिवृत्त वित्त व लेखा अधिकारी, कवि कुलगुरु कालीदास संस्कृत विद्यापीठ, रामटेक, जि.नागपूर यांना रु.८०००-१३५००/- ही वेतनश्रेणी अनुज्ञेय करण्यात येत आहे. श्री.देशपांडे यांना अनुज्ञेय करण्यात आलेल्या वेतनश्रेणीनुसार महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम १९८२ मधील नियम ११०(२)(ए) किंवा नियम ११०(२)(बी) यापैकी जो नियम त्यांचे प्रकरणी लागू होईल त्यानुसार निवृत्तीवेतन अनुज्ञेय करण्यात येत आहे. तथापि, सदर मान्यता शासनाच्या वतीने मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल करण्यात येणा-या विशेष अनुमती याचिकेमधील निकालाच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

सदरचा शासन निर्णय मा.उच्च न्यायालय, नागपूर खंडपीठ, नागपूर यांच्या याचिका क्र.४५४५/२०१३ मधील दि.२६ ऑगस्ट, २०१४ च्या आदेशानुसार व विधी व न्याय विभागाच्या दि.०२.०४.२०१४ परिपत्रकातील सूचना विचारात घेऊन वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.७०/ सेवा-४, दि.१०.०७.२०१५अन्वये मिळालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७२३१७२४३००१०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Harshwardhan Tukaram Jadhav

Digitally signed by Harshwardhan Tukaram Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Harshwardhan Tukaram Jadhav
Date: 2015.08.01 14:59:08 +05'30'

**( हर्षवर्धन तु. जाधव )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
२. कुलसचिव, कवि कुलगुरु कालीदास संस्कृत विद्यापीठ, रामटेक, जि.नागपूर,
३. विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण, नागपूर विभाग, नागपूर,
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १ व २ महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
५. महालेखापाल (लेखा परीक्षा), १ व २ महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
६. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर,
७. कक्ष अधिकारी, सेवा-४, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
८. निवड नस्ती वि.शि.-१